अकोला महानगरपालिका स्थायी समिती पारित ठराव क्र.०२ दिनांक ०१/०४/२०२१ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-अकोला-१५२१/ठराव क्र.२/प्र.क्र.१३६/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३ डिसेंबर, २०२१

वाचा:-

१. आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा / साप्रवि /आस्था /३४७ / २०२१, दिनांक १७/०६/२०२१
२. शा.नि.समक्रमांक दि.२४/०८/२०२१
३. आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा /साप्रवि /आस्था / ८०४ / २०२१, दिनांक ०९/०९/२०२१

प्रस्तावना :-

अकोला महानगरपालिकेच्या विविध विभागाच्या मागणीनुसार आवश्यक पदांवर १६८ कंत्राटी मनुष्यबळ पुरवणेबाबत निविदा प्रसिध्द करून “क्षितीज नागरी सेवा सहकारी संस्था, अमरावती” यांची कमी दराची निविदा मंजुर करण्याबाबतचा प्रस्ताव अकोला महानगरपालिका प्रशासनाने स्थायी समितीसमोर सादर केला. प्रशासनाच्या प्रस्तावास मान्यता न देता “मे.साहिल इंडस्ट्रीज, भोसरी, पुणे” यांना मुदतवाढ देण्याबाबत अकोला महानगरपालिकेच्या स्थायी समितीने ठराव क्र. ०२ दि.०१ एप्रिल, २०२१ पारीत केला. सदर ठराव विखंडित करण्याबाबत आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुलक्षून अकोला महानगरपालिका, स्थायी समिती ठराव क्र.०२ दिनांक ०१ एप्रिल,२०२१ हा संदर्भाधीन क्र.०२ येथील दि. २४ ऑगस्ट,२०२१ च्या शासन निर्णयान्वये तात्पुरता निलंबित करण्यात आलेला आहे. तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१(२) नुसार आदेशाच्या दिनांकापासुन १ महिन्याच्या आत आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला तसेच सभापती, स्थायी समिती, अकोला महानगरपालिका यांना अभिवेदन करण्यास संधी देण्यात आली.

त्यानुसार आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी दि. ०९ सप्टेंबर, २०२१ च्या पत्रान्वये प्रशासनाचे अभिवेदन सादर केले असून याबाबत सभापती अथवा त्यांच्या वतीने अन्य अभिवेदन आजअखेर प्राप्त झाले नाही.आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी त्यांच्या अभिवेदनामध्ये नमुद केले आहे की, प्रशासनाने राबविलेल्या निविदा प्रक्रियाअंती “क्षितीज नागरीक सेवा सहकारी संस्था,

अमरावती" यांची कमी दराची निविदा मंजुर करण्याबाबतच्या प्रशासनाच्या प्रस्तावास मान्यता न देता स्थायी समितीने ठराव क्र.०२ दिनांक ०१ एप्रिल,२०२१ अन्वये मे. साहिल इंडस्ट्रीज, भोसरी, पुणे यांना मुदतवाढ देण्याबाबत सदर स्थायी समिती ठराव क्र.०२ दिनांक ०१ एप्रिल,२०२१ हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने तो कायमस्वरूपी विखंडित करावा.

तद्नुसार महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१(३) अनुसार सदरचा ठराव अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अकोला महानगरपालिका स्थायी समिती ठराव क्र. ०२ दि.०१ एप्रिल, २०२१ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०३१७४६५३८०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2021.12.03 17:57:52 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.महापौर, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
२) मा.सभापती, स्थायी समिती, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
३) आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय,मुंबई
५) उप सचिव (नवि-२६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.